केंद्र शासनाच्या "भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य २०२२-२३" या योजनेच्या भाग-१ अंतर्गत उर्वरित दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सिआयडी-३३२२/प्र.क्र.९४/नवि-१०**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २८ मार्च, २०२३

वाचा :- १) भारत सरकार, वित्त मंत्रालय यांचे कार्यालयीन ज्ञापन क्र.F.No.४४(१)/PF-S/२०२२-२३ (CAPEX), दि.०६.०४.२०२२
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२०/प्र.क्र.५१/२०/कोषा प्रशा-५, दि.१३.३.२०२० व ३.३.२०२१
३) वित्त विभागाने शासन परिपत्रक क्र. संकीर्ण-२०२१/प्र.क्र.३५/कोषा प्रशा-४, दि. १.७.२०२१
४) शासन निर्णय क्र.सिआयडी-३३२२/प्र.क्र.९३/नवि-१०, दि.७.१०.२०२२ व दि.१७.१०.२०२२.
५) शासन निर्णय समक्रमांक, दि.२७.१२.२०२२
६) वित्त विभाग, पत्र क्र.अर्थसं-२०२२/प्र.क्र.१४/अर्थ-३, दि.२७.३.२०२३

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाच्या सन २०२२-२३ साठी " भांडवली गुंतवणुकीसाठी राज्यांना विशेष सहाय्य २०२२-२३" या योजनेंतर्गत राज्य सरकारांना भांडवली गुंतवणूक प्रकल्पांसाठी ५० वर्षांच्या बिनव्याजी कर्जाच्या स्वरूपात आर्थिक सहाय्य प्रदान करण्यात येत आहे. यासंदर्भात केंद्र शासनाच्या व्यय विभागाने दिनांक ०६.०४.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सदर योजनेची मार्गदर्शक तत्वे निर्गमित केली आहेत. संबंधीत विभागांनी खर्चाचे स्वतंत्र लेखाशीर्ष घेवून अर्थसंकल्पीय तरतूद करुन केंद्र शासनाच्या दि.२३.०३.२०२१ रोजीच्या केंद्र पुरस्कृत योजनांच्या निधी वाटपासंदर्भात विहीत कार्यप्रणालीचे व वित्त विभागाच्या संदर्भीत क्र.३, दि.१.७.२०२१ अन्वये निश्चित कार्यप्रणालीचे पालन करणे आवश्यक आहे. सदर निधी अर्थसंकल्पीत करुन वितरित करणेसाठी संदर्भीय क्र.३ च्या शासन निर्णयान्वये "नोडल अधिकारी" यांची नेमणुक करण्यात आली आहे.

**०२.** केंद्र शासनाच्या भांडवली गुंतवणूकीच्या विशेष सहाय्य योजना २०२२-२३ च्या भाग-१ अंतर्गत मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण व सिडको महामंडळ यांनी विविध प्रकल्पांचे प्रस्ताव वित्त विभागाकडून सदर प्रस्ताव केंद्र शासनाकडे पाठवण्यात आले होते. केंद्र शासनाच्या दि.२०.०७.२०२२ च्या आदेशान्वये सदर प्रकल्पांना एकूण रू.१३०४ कोटी निधी मंजूर करण्यात आलेला आहे. सदर मंजूर ५०% रकमेचा पहिला हप्ता रू.६५२ कोटी संदर्भाधीन दि.२७.१२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला आहे. सद्यस्थितीत, दुसऱ्या

हप्त्याचा उर्वरित रू.६५२ कोटी निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगांने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय : -**

१. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य २०२२-२३ या योजनेच्या भाग-१ अंतर्गत केंद्र शासनाने मंजूर केलेल्या निधीनुसार सन २०२२-२३ या चालू वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदीमधून उर्वरित दुसऱ्या हफ्त्याचा निधी **रु.६५२,००,००,०००/- (अक्षरी रुपये सहाशे बावन्न कोटी फक्त)** मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण व सिडको महामंडळ यांना प्रकल्पनिहाय वितरीत करण्यास खालीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे :-

| अ. क्र. | प्रकल्पाचे नाव | मंजूर रक्कम (रू.कोटी) | या आदेशाद्वारे वितरीत रक्कम (दुसरा हप्ता) (रू.कोटी) | अंमलबजावणी यंत्रणा |
|---|---|---|---|---|
| १ | शिवडी ६वरळी उन्नत मार्ग | ५०० | २५० | MMRDA |
| २ | कुर्ला ते वाकोला उड्डाणपूल आणि कुर्ला येथे एमटी एनएल जंक्शान, बीकेसी ते एलबीएस उड्डाणपूल यांवर उन्नत मार्गिका | १७५ | ८७.५० | |
| ३ | भारत बोर्ज कंपनी, बीकेसी ते वाकोला जंक्शन दरम्यान उन्नत मार्गिका | ४५ | २२.५० | |
| ४ | पुणे विद्यापीठ चैाकात मेट्रो रेल मार्गिकेसोबत एकात्मिक दुमजली उड्डाणपूलाची उभारणी | ७५ | ३७.५० | PMRDA |
| ५ | कोंढाणे प्रकल्प पाणी पुरवठा योजना (२५०MLD) | २५० | १२५ | CIDCO |
| ६ | बाळगंगा प्रकल्प पाणी पुरवठा (३५०MLD) | २५९ | १२९.५० | |
| | **एकूण** | **१३०४** | **६५२** | |

२. उपरोक्त प्रकल्पांसाठी वितरीत केलेला निधी " मागणी क्रमांक - एफ-०७, ६२१७, नगर विकासासाठी कर्जे ०१ राज्य भांडवली विकास १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांसाठी कर्जे (०१) केंद्र शासनाकडून राज्यांना भांडवली गुंतवणूकीसाठी विशेष सहाय्य योजनेंतर्गत बिनव्याजी कर्ज (केंद्र हिस्सा १००%) (०१) (०१) भांडवली कामे (योजना भाग-१) (६२१७०९७५) (कार्यक्रम), ५५ कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षाखाली सन २०२२-२३ मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावा.

३. उपरोक्त लेखाशीर्षाखालील निधी आहरित करण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५ (रोखशाखा), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “आहरण व संवितरण अधिकारी” तसेच सह/उप सचिव (नवि-१०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. शासन निर्णयातील परिच्छेद क्र. १ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम आहरण व संवितरण अधिकारी यांनी अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडे देयके सादर करून प्राप्त निधी मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण व सिडको महामंडळास देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. याबाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही -नवि-३१ कार्यासनाने करावी. सदरचे निधी वितरण हे बिनशर्त स्वरुपाचे आहे.

५. केंद्र शासनाच्या राज्यांना भांडवली खर्चासाठी विशेष सहाय्य योजनेच्या भाग-१ अंतर्गत वितरीत करण्यात आलेला निधीसंदर्भात मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण व सिडको महामंडळाने महालेखापाल यांनी विहित केलेल्या नमुन्यात लेखे ठेवावेत.

६. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना व निधी मंजूरी आदेशानुसार सदरचा निधी दि.३१.३.२०२३ पर्यंत खर्च करणे बंधनकारक आहे.

७. केंद्र शासनाने ज्या प्रकल्पांसाठी निधी मंजूर केला आहे, त्याच प्रकल्पांसाठी व त्यातील प्रयोजनासाठीच निधी खर्च होईल याची सिडको महामंडळ व संचालक, नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग, पुणे यांनी खबरदारी घ्यावी व अशा खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास दि.१०.४.२०२३ पर्यंत शासनास सादर करणे बंधनकारक राहील.

८. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशील प्रत्येक महिन्याला राज्य शासनास सह/उप सचिव (नवि-१० / नवि-२७), नगर विकास विभाग, मंत्रालय यांना सादर करण्यात यावा. तसेच लेखापरिक्षणासाठी शासनांस/शासनाने नियुक्त केलेल्या यंत्रणेस उपलब्ध करून देण्यात यावा.

९. सदर योजनेच्या भाग-६ अंतर्गत केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या कर्जावरील व्याज “०२१७-नगर विकास, ६० - इतर नगर विकास योजना, ८०१- अनुदानग्राहीकडून अखर्चित शिलकींवरील व्याज किंवा इतर जमा रकमा, (०१) व्याज, (०१)(०१) सिंगल नोडल एजन्सी खात्यातील अखर्चित शिलकींवरील व्याज (०२१७०२१२)” या लेखाशिर्षाखाली राज्य शासनाकडे जमा करावे व भरणा केलेल्या रक्कमेच्या चलनाची प्रत शासनास सादर करावी.

१०.केंद्र शासनाच्या वित्त विभागाने दि.६.४.२०२२, दि.६.७.२०२२ व दि.१६.१२.२०२२ रोजीच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेवून प्रकल्पनिहाय वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करावा तसेच राज्य शासनाच्या दि.१.७.२०२१ अन्वये दिलेल्या सूचनांचे पालन करणे बंधनकारक आहे.

११.सदर निधी वितरण आदेश वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.६ येथील पत्रान्वये दिलेल्या विभागात प्राप्त् मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०३२७२२१३४०७१२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by SHINDE SUBRAO NARAYAN
Date: 2023.03.29 12:34:44 +05'30'

**( सु. ना. शिंदे )**
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. अपर मुख्य सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव ( नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. उपाध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, सिडको,मुंबई.
९. महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,मुंबई.
१०. महानगर आयुक्त, पुणे महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,पुणे.
११. संचालक, नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग, पुणे.
१२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, मुंबई / नागपुर
१३. महालेखापाल, (लेखापरिक्षा)- १/२, मुंबई/ नागपुर
१४. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१६. सह सचिव (नवि-१०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१७. उप सचिव (नवि-७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१८. उप सचिव (नवि-४, नवि-३१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१९. निवड नस्ती (नवि-१०).